**दुग्धव्यवसाय विकास विभागातील गट-अ व गट -ब मधील अधिका-यांच्या बदल्यांचे अधिकार प्रत्यार्पित करण्याबाबत आदेशास दिलेली स्थगिती उठविणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : दुविप्र १११५/प्र.क्र.५/ पदुम ६**
मंत्रालय विस्तार,मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई ४०० ०३२.
**दिनांक : १४ मे, २०१५.**

**वाचा :-** १) महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५.
२) या विभागाचा शासन निर्णय, समक्रमांक, दिनांक ११.२.२०१५
३) या विभागाचा शासन निर्णय, समक्रमांक, दिनांक २१.४.२०१५

**शासन निर्णय :-**

शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन करण्यासाठी आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध करण्यासाठी तरतूद करण्याकरीता अधिनियम, २००५ मधील कलम-६ खालील परंतुक २ व कलम ७ मधील तरतूदीनुसार दुग्धव्यवसाय विकास विभागातील गट-अ व गट-ब संवर्गातील अधिका-यांची बदली करण्याचे अधिकार प्रत्यार्पित करण्याबाबतचे आदेश संदर्भ क्र. २ येथील दिनांक ११.२.२०१५ च्या शासन निर्णयान्वये दिले होते.तद्नंतर सदर शासन निर्णयास पुढील आदेश होईपर्यंत संदर्भ क्र.३ येथील दिनांक २१.४.२०१५ च्या शासन निर्णयान्वये स्थगिती दिली होती.

२. यासंदर्भात शासन खालीलप्रमाणे निदेश देत आहे :

१) शासन निर्णय, दिनांक २१.४.२०१५ अन्वये दिनांक ११.२.२०१५ च्या शासन निर्णयास दिलेली स्थगिती उठविण्यात येत आहे.

२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही २०१४/प्र.क्र.२६/कार्या-१२ दिनांक १९.१.२०१५ अन्वये दिलेल्या आदेशानुसार दुग्धव्यवसाय विकास विभागातील गट-अ व गट-ब संवर्गातील अधिका-यांच्या बदलीबाबत प्रस्ताव सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी स्थापन केलेल्या नागरी सेवा मंडळाकडे सादर करणे आवश्यक आहे.

३) नियतकालिक बदल्यांव्यतिरिक्त बदलीबाबतच्या प्रस्तावास एक टप्पा वरिष्ठ सक्षम प्राधिकाऱ्याची मान्यता घेणे आवश्यक राहिल.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५१४१११२५२४८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shashank Madhav Sathe

Digitally signed by Shashank Madhav Sathe
DN: CN = Shashank Madhav Sathe, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.05.14 12:17:00 +05'30'

**(श.मा. साठे)**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत :**

१. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. सचिव (पदुम) यांचे स्वीय सहाय्यक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
४. आयुक्त दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, वरळी, मुंबई
५. महाव्यवस्थापक, बृहन्मुंबई दूध योजना, वरळी, मुंबई
६. सर्व प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी
७. सर्व जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी
८.निवड नस्ती